सास्तुर, ता. लोहारा, जि. उस्मानाबाद येथील प्राईड इंडिया संस्थेच्या स्पर्श रूग्णालयास सन २०१३-१४ या वर्षीचे अनुदान मंजुर करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्राईड-२०१५/ प्र.क्र.५३/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: १० मार्च, २०१५.

**वाचा**

१) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः आरएलएच-२७९६/१४५२/प्र.क्र.२४६/ आरोग्य-४, दि.२६.०६.२०००.**
२) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः प्राईड-२०१०/ प्र.क्र.९९/ आरोग्य-४, दि.२३.०९.२०१२.**
३) **सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये ( राज्यस्तर ), मुंबई यांचे पत्र, क्रमांकः संआसे / राज्यस्तर/ ग्रारू/ सास्तूर/ टे-२/कक्ष-३/जा.क्र.४४७-४४८/२०१४, दि.३१.१२.२०१४.**

**प्रस्तावना**

सन १९९३ या वर्षी सास्तुर, जि.उस्मानाबाद येथे झालेल्या भुकंपाच्या पार्श्वभुमीवर तेथील नागरिकांना आरोग्य सेवा/सुविधा मिळण्याच्या उद्देशाने प्राईड इंडिया या संस्थेने स्पर्श रूग्णालयाची स्थापना केलेली आहे. सदर रूग्णालयाला शासनातर्फे आर्थिक मदत देण्यासाठी विभागामार्फत दिनांक २६.०६.२००० च्या शासन निर्णयान्वये सदर संस्थेसोबत करारनामा केलेला होता. या संस्थेशी दिनांक २९.११.२०१२ रोजी सुधारीत करारनामा करण्यात आला आहे. या करारनाम्यानुसार ग्रामीण रूग्णालयाकरीता येणाऱ्या खर्चाइतके अनुदान ( रू. ५३.०४ लक्ष ) किंवा संस्थेने कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते आणि औषधे रूपये ४ लाख व आकस्मिकता खर्च रू. २ लाख यापैकी जी रक्कम कमी असेल त्याप्रमाणात अनुदान संस्थेस देण्यास संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. या शासन निर्णयाच्या परिशिष्ट "अ" मधील अट क्र. ११ मध्ये नमुद केल्यानुसार सहाय्यक संचालक, उपसंचालक आरोग्य सेवा, लातूर यांचे कार्यालय यांनी दिनांक २९.१०.२०१४ रोजी या रूग्णालयाची भेट देऊन तपासणी केलेली आहे. सदर तपासणी अहवाल व उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ, लातूर यांच्या शिफारसीनुसार सहसंचालकांकडून या रूग्णालयासाठी सन २०१३-१४ या वर्षातील अनुदान रूपये ५३.०४ लक्ष मंजुर करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे. या अनुषंगाने सदर अनुदानाच्या प्रस्तावास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

सास्तूर, ता.लोहारा, जि. उस्मानाबाद येथील प्राईड इंडिया संस्थेचे स्पर्श रूग्णालयाकरीता सन २०१३-१४ या वर्षामध्ये केलेल्या खर्चाच्या अनुषंगाने व सदर संस्थेच्या सहाय्यक संचालक, उपसंचालक आरोग्य सेवा,

लातूर यांचे कार्यालय यांनी केलेल्या तपासणी अहवालानुसार संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मंजुर केलेल्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ अन्वये अनुज्ञेय करण्यात आलेले रूपये ५३.०४ लक्ष ( अक्षरी रूपये त्रेपन्न लक्ष चार हजार फक्त ) इतके अनुदान मंजुरीस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

प्रस्तुत प्रयोजनार्थ होणारा खर्च सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर असलेल्या अनुदानातून खालील लेखाशीर्षांतर्गत भागविण्यात यावा.

**मागणी क्र. आर-१**

| | |
|---|---|
| “२२१०- | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य |
| ०१- | नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा ग्रामीण आरोग्य सेवा |
| ११०- | रूग्णालये व दवाखाने |
| ११०( ४ )- | मुफसल रूग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदान |
| (०३) (०१)- | अध्यापनेतर रूग्णालये व दवाखने यांना सहाय्यक अनुदान ( २२१० ०१७३ ) |
| ३१- | सहाय्यक अनुदाने ” |

प्रस्तुत तरतूद उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर यांच्या अधिनस्त ठेवण्याबाबतची कार्यवाही सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थसंकल्प व प्रशासन ), पुणे यांनी करावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्र. विअप्र-१०.०८/ प्र.क्र.७०/ २००८/ विनियम, दि.१५.०५.२००९ सोबतच्या परिशिष्टातील भाग-पहिला, उपविभाग-एक मधील अनुक्रमांक २७ येथील नियम क्र.१४९ अन्वये संस्थांना आवर्ती सहाय्यक अनुदान मंजुर करण्याबाबत प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०९१४५८३९६२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.03.10 13:28:32 +05'30'

**संजय कमलाकर**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा ( कुटूंब कल्याण, माता बालसंगोपन व शालेय आरोग्य),पुणे.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
४. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), पुणे.

६. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर.
९. महालेखापाल,१/२ महाराष्ट्र( लेखा व लेखापरिक्षा )/ ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
१०. वित्त विभाग (विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.